राज्यातील उपकेंद्रे, प्राथमिक आरोग्य केंद्रे आणि ३० खाटांच्या ग्रामिण/ कुटीर रुग्णालयांच्या कर्मचारी आकृतीबंधात सुधारणा करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्र.पीएचसी-१०९७/२८६/प्र.क्र.२६/९७/आरोग्य-४
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : १६ जानेवारी, २००३.

**संदर्भ** :
१) शासन निर्णय ,सार्वजनिक आरोग्द विभाग,क्र. पीएचसी-१०९४/४१९९/प्र.क्र.१३/९५/आरोग्य-४,दिनांक १.१.१९९६
२) महासंचालक, आरोग्य सेवा, म.रा.मुंबई यांचे क्र.संआसे/निविमु/ग्रा.रु./प्रा.आ.के./आकृतीबंध /टे-२/कक्ष-७/०२,दि.१३.८.२००२
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.पीएचसी १०९४/४१८९/प्र.क्र.१३/९५/आरोग्य ४, दि.१४ ऑगस्ट, २००२.

**प्रस्तावना** : राज्यातील उपकेंद्रे, प्राथमिक आरोग्य केंद्रे आणि ३० खाटांच्या ग्रामिण व कुटीर रुग्णालयांच्या कर्मचारी आकृतीबंधास उपरोक्त संदर्भ क्र. १ व ३ वरील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. या आकृतीबंधात बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** : उपरोक्त संदर्भ क्रमांक १ व ३ अन्वये मान्यता दिलेल्या (उपकेंद्राचा आकृतीबंध वगळता) प्राथमिक आरोग्य केंद्रे व ग्रामिण/ कुटीर रुग्णालये यांचा आकृतीबंध रद्द समजण्यात यावा आणि आता या शासन निर्णयाच्या प्रपत्र "ब" व "क" मधील अनुक्रमे प्राथमिक आरोग्य केंद्रे आणि ३० खाटांच्या ग्रामिण व कुटीर रुग्णालयाच्या सुधारित आकृतीबंधास मान्यता देण्यात येत आहे आणि उपकेंद्राचा आकृतीबंध प्रपत्र "अ" प्रमाणे कायम ठेवण्यात आला आहे.

२. या शासन निर्णयाच्या सहपत्रात नमूद केल्यानुसार कंत्राटी पद्धतीवर उपलब्ध करावयाच्या सुविधांसाठी नियमित पद्धतीने पदे भरली असता येणा-या वेतन खर्चाच्या ५० टक्क्यांपेक्षा जास्त खर्च येऊ नये. ही कामे कंत्राटी पद्धतीने घेण्यासाठी द्यावयाच्या मोबदल्याकरीता अर्थसंकल्पीय तरतूद करण्याची कार्यवाही महासंचालकांनी करावी.

३. कामगार विभागा अंतर्गत कंत्राटी पद्धतीने सुरक्षा सेवा व इतर सेवा देणारी विविध मंडळे अस्तित्वात आहेत. त्यांच्यामार्फत या सेवा घेण्यात याव्यात. या व्यतिरिक्त जिल्हास्तरावर सुरक्षा सेवेसाठी सैनिक बोर्ड मार्फत सेवा घेण्यात यावी.

४. सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत सर्व पदाच्या आढाव्यानुसार उपलब्ध होणा-या अतिरिक्त पदांमधून प्राथमिक आरोग्य केंद्रे/ग्रामीण/कुटीर रुग्णालयांना प्राधान्याने पदे उपलब्ध करुन द्यावीत.


२००३०८२०१६०६५९००१-१९००

त्यानंतर उरलेल्या पदांच्या पदनिर्मितीकरीता महासंचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी शासनास प्रस्ताव सादर करावा.

५. सदर शासन निर्णय दि.१५.१.२००३ रोजी मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय समितीने मान्यता दिल्यानुसार व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३२/विसु, दिनांक १५.१.२००३ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( प्र.के.प्रधान )
उपसचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,
प्रधान सचिव (आरोग्य) , सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (कुटुंब कल्याण) , सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
महालेखापाल (लेखा परीक्षा)/ (लेखा अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
सहसंचालक, आरोग्य सेवा (निविमु) मुंबई.
सहसंचालक, आरोग्य सेवा (आ.)पुणे.
अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण मा.बा.सं. व शा.आ.) पुणे.
आरोग्य सेवा उपसंचालक, प्रभारी सर्व आरोग्य मंडळे.
सर्व जिल्हा शल्य चिकित्सक.
सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
सर्व जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन व विकास मंडळ.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई .
आरोग्य -२ ( अतिरिक्त पदांच्या करावयाच्या कार्यवाहीबाबत), सा.आ.वि.मंत्रालय, मुंबई.
अर्थसंकल्प कार्यासन, सा.आ.वि.मंत्रालय, मुंबई.
आस्थापना कार्यासन ,सा.आ.वि.मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती आरोग्य-४ ,सा.आ.वि.मंत्रालय, मुंबई.

**शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र .पीएचसी-१०९७/२८६/प्र.क्र.२६/९७/आरोग्य-४ दिनांक १६ जानेवारी, २००३ चे सहपत्र.**

**प्रपत्र अ**

**उपकेंद्रांचा कर्मचारी आकृतीबंध**

शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.पीएचसी १०९४/४२११/प्र.क्र.१३/९५/आ.४, दि.१.१.१९९६ मध्ये विहित केल्याप्रमाणे कायम ठेवण्यात आलेला आकृतीबंध

| अ.क्र. | पदाचे नांव | मंजूर पदे |
|---|---|---|
| १) | स्त्री आरोग्य कर्मचारी (ए.एन.एम.) | १ |
| २) | पुरुष आरोग्य कर्मचारी (एम.पी.डब्ल्यू.) | १ |
| ३) | अंशकालीन स्त्री परिचर | १ |
| | एकूण | ३ |

शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.पीएचसी-१०९७/२८६/प्र.क्र.२६/९७/आरोग्य-४
दिनांक १६ जानेवारी, २००३ चे सहपत्र.

प्रपत्र -ब

प्राथमिक आरोग्य केंद्राचा कर्मचारी आकृतीबंध

| अ.क्र. | पदाचे नांव | बिगर आदिवासी क्षेत्रासाठी मंजूर पदे | आदिवासी क्षेत्रासाठी मंजूर पदे |
|---|---|---|---|
| | **तांत्रिक पदे** | | |
| १ | वैद्यकीय अधिकारी,वर्ग-२ | २ | १ |
| २ | वैद्यकीय अधिकारी, वर्ग-३ | - | १ |
| ३ | आरोग्य सहाय्यक (पुरुष) | १ | १ |
| ४ | आरोग्य सहाय्यक (स्त्री) | १ | १ |
| ५ | सहाय्यक परिचारिका प्रसाविका (ए.एन.एम.) | १ | १ |
| ५ | प्रयोगशाळा तंत्रज्ञ | - | १ |
| ६ | मिश्रक | १ | १ |
| | **अतांत्रिक पदे** | | |
| ७ | कनिष्ठ लिपिक | १ | १ |
| ८ | वाहन चालक | १ | १ |
| ९ | सफाईगार | १ | १ |
| १० | स्त्री परिचर | १ | १ |
| ११ | पुरुष परिचर | ३ | ३ |
| | **एकुण** | १३ | १४ |

**प्राथमिक आरोग्य केंद्रासाठी कंत्राटी पद्धतीवर उपलब्ध करावयाच्या सुविधा**

१) सुरक्षेच्या सेवा

२) स्वच्छतेच्या सेवा

३) वाहन चालक

**टीप** : ज्या ग्रामीण रुग्णालयांना वाहन चालकांची पदे मंजूर असून त्या पदांवर नियुक्त्या केलेल्या आहेत त्या पदांवरील कर्मचारी सेवानिवृत्त होईपर्यंत फक्त ती पदे चालू राहतील. त्यानंतर तेथे वाहनचालक कंत्राटी पद्धतीने दिले जातील.

**टीप** : ज्या ग्रामीण रुग्णालयांना वाहनचालकांची पदे मंजूर असून त्या पदांवर नियुक्त्या केलेल्या आहेत त्या पदांवरील कर्मचारी सेवानिवृत्त होईपर्यंत फक्त ती पदे चालू राहतील. त्यानंतर तेथे वाहनचालक कंत्राटी पद्धतीने दिले जातील.

----